उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर तालुक्यातील पुनर्वसित गावठाणांमधील नागरी सुविधा कामांसाठी निधी मंजुरीबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.१०५/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २४/११/२०२१

**वाचा:**

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/२४/प्र.क्र.८/र-८, दि.२५.०१.२०१९
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. पुनर्व-२०१९/२६०/प्र.क्र.५७/र-८, दि. १६.०७.२०१९
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. अर्थसं -२०२१/६६/प्र.क्र.३१/र-८, दि. २५.०३.२०२१
७) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं-२०२१/७०/प्र.क्र.३३/र-८, दि. २५.०३.२०२१
८) वित्त विभाग शासन निर्णय क्र: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१.
९) सहा अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे पत्र क्र.भीकामं/लेखा/५३०८सन २०२१, दि.१३.१०.२०२१.

**प्रस्तावना:**

उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्हयातील पंढरपूर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यापैकी काही कामांना संदर्भाधीन क्र. ६ व ७ येथील आदेशांन्वये निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानूसार सदर नागरी सुविधा कामांपैकी प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी रूपये २८.४० लक्ष चा निधी मागणी प्रस्ताव प्रकल्प यंत्रणेने शासनास सादर केला आहे.

२. त्यानुसार प्रकल्प यंत्रणेने सादर केलेल्या प्रस्तावातील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांना कामाच्या प्रगतीनुसार प्रशासकीय मान्यता रक्कमेच्या मर्यादेत देय निधी उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:**

उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांसाठी रूपये २८,४०,०००/- निधी सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे

२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, उजनी प्रकल्पांतर्गत सोलापूर जिल्ह्यातील पंढरपूर तालुक्यातील पुनर्वसित गावांमधील प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये २८,४०,०००/- (रुपये अठ्ठावीस लक्ष चाळीस हजार फक्त) एवढा निधी “मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधरे-वाणिज्यीक, ०१, संचालक व प्रशासन, (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७)(दत्तमत)” या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ. क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरित करावयाची रक्कम रूपये (१२ % जीएसटी सह) |
|---|---|---|---|
| १ | आढीव देगांव (ता. पंढरपूर) | सिमेंट-कॉंक्रीट गटार बांधणे | २३,४०,०००/- |
| २ | मौजे आव्हे (ता. पंढरपूर) | ग्रामपंचायत कार्यालय, शौचालय आणि ध्वजस्तंभासह | ५,००,०००/- |
| | | **एकूण-** | **२८,४०,०००/-** |

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरित करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/ मंजूरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत तसेच तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे व संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ०१, संचालक व प्रशासन, (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account/PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी- १०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ०१, संचालक व प्रशासन, (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्य लेखाशीर्ष "मागणी क्रमांक सी-१०, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१, मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ०१, संचालक व प्रशासन, (००)(०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) या संदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

**११)** संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/ शासनास तातडीने सादर करावे.

**१२)** यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०३१०१५१५९५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2022.01.03 10:16:31 +05'30'

**(संजय जगताप)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन), पुणेविभाग,पुणे
२. उप आयुक्त (पुनर्वसन),पुणे
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सोलापूर
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
६. अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर
७. कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर
८. जिल्हाकोषागारअधिकारी,सोलापूर
९. वित्तविभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३,मंत्रालय,मुंबई-३२.
१०.जलसंपदाविभाग, कार्यासन मोप्र-२,मंत्रालय,मुंबई-३२.
११.नियोजनविभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय,मुंबई ३२.
१२.महसूलववनविभाग,कार्यासनब-१,मंत्रालय,मुंबई ३२.
१३.महसूलव वन विभाग,पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय,मुंबई ३२.
१४.निवडनस्तीकार्यासन र-८,महसूलववन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

* *